शासन राबवित असलेल्या कल्याणकारी योजनांची विशेष प्रसिद्धी मोहिम.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मावज २०१५/प्र.क्र. ३२१/३४**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ३२
तारीख : २६ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, यांचे पत्र क्रमांक : पत्र क्र.प्रदशने का -६/प्रसि बा. मा.अ /२०१५/१११, दिनांक १६ ऑक्टोबर २०१५.

**प्रस्तावना:-**

शासन राबवित असलेल्या विविध जनकल्याणकारी योजना समाजातील सर्वस्तरातील जनतेपर्यंत प्रभावीपणे नेण्याकरीता तसेच विद्यमान शासनाच्या वर्षपूर्तीनिमित्त विशेष प्रसिध्दी मोहिमेचे नियोजन करण्यात आले आहे.

"शासकिय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहिम" या योजनेसाठी सन २०१५-१६ या वर्षासाठी योजनांतर्गत रु. २१ कोटी ८८ लाख इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु १५,३१,६०,००० एवढा निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे .अर्थसंकल्पीत झालेल्या निधी पैकी रु. १५,००,५२,२९८/- (रु. पंधरा कोटी बावन्न हजार दोनशे अठ्ठयाण्णव फक्त) एवढ्या खर्चाची "विशेष प्रसिध्दी मोहीम" राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय : -**

शासन राबवत असलेल्या विविध कल्याणकारी योजनांची माहिती समाजातील सर्व स्तरातील जनतेपर्यंत प्रभाविपणे पोहचविण्यासाठी माहिती व जनसंपर्क संचलनालयाकडुन "विशेष प्रसिध्दी मोहीम" राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. "जाहिरात व दृक प्रसिद्धी" माध्यमाद्वारे प्रसिद्धी करण्यासाठी खाली नमूद प्रसिद्धीच्या बाबींसाठी येणाऱ्या रु. १५,००,५२,२९८/- (रु. पंधरा कोटी बावन्न हजार दोनशे अठ्ठयाण्णव फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास देखील शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रसिध्दीची बाब | तपशील |
|---|---|---|
| १ | वृत्तपत्रातील जाहिराती | शासनमान्य यादीतील अ+ब+क वर्गातील वृत्तपत्रांतून अर्धपान आकाराच्या (८०० चौ.सें.मी) जाहिराती प्रसारित करणे |
| २ | इलेक्ट्रॉनिक मिडीयाव्दारे प्रसिध्दी | जाहिरातीची निर्मिती (जिंगल /स्पॉट) निर्मिती करणे आणि आकाशवाणी केंद्रे, विविध एफ एम वाहिन्या, दूरदर्शन, दूरचित्रवाणी वाहिन्या आणि चित्रपटगृहातून तसेच केबलद्वारे प्रसारण करणे. |

| | | |
|---|---|---|
| ३ | पुस्तिका, संपादकीय लेख | मराठी,हिंदी व इंग्रजी पुस्तिका तयार करून छपाई करणे. मराठी,हिंदी व इंग्रजी मासिकामध्ये संपादकीय लेख तयार करून छपाई करणे. |
| ४ | आऊटडोअर माध्यमांव्दारे प्रसिध्दी | अ) प्रदर्शन संच व त्याव्दारे प्रदर्शनांचे आयोजन<br>ब) होर्डिंगवरून संदेश प्रसारण<br>क) बेस्ट बसेसवरुन संदेश प्रसारण<br>ड) एस.टी बसेसवरून संदेश प्रसारण<br>इ) एल.ई.डी., व्हिडीयोवॉल द्वारे प्रसिद्धी |
| ५ | माहिती व जनसंपर्क महसंचालनालयाच्या अधिनस्त विभागीय कार्यालयांना स्थानिक प्रसिद्धीसाठी निधी वर्ग करणे | सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ३० जून २०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच सामान्य प्रशासन विभाग ,मंत्रालय यांचे दि ४ जुलै, २०१५ रोजीच्या पत्रानुसार एकच संदेश सर्व राज्यात एकाच वेळी लावण्यासाठी स्थानिक संस्थाकडून प्रसिध्दी करण्यासाठी प्रत्येक विभागीय कार्यालयांसाठी व जिल्हयासाठी निधी वर्ग करणे |
| ६ | प्रसिध्दी मोहिम संकल्पना व निर्मिती | मोहिमेसाठी लोगो / बेस लाईन, वृत्तपत्रातील जाहिरातीचे आर्टवर्क, होर्डिंग माहिती पुस्तिका, बॅनर्स, दृकश्राव्य माध्यमांव्दारे प्रसिध्दीसाठी दूरचित्रवाणी ( T.V ) -रेडिओ साठी स्पॉट निर्मिती, जिंगल्स, डिजीटल सोशल माध्यमांसाठी संकल्पना निर्मिती व मोहिमेसाठी इतर अनुषंगिक बाबींसाठी संकल्पना, आर्टवर्क तयार करण्यासाठी जाहिरात संस्था नेमून काम करून घेणे. |
| ७ | एकूण अंदाजित खर्च | रु. १५,००,५२,२९८/- (रु. पंधरा कोटी बावन्न हजार दोनशे अठ्ठयाण्णव फक्त) |

२. उपरोक्त प्रसिद्धीच्या बाबीसाठी येणारा खर्च रु. १५,००,५२,२९८/- (रु. पंधरा कोटी बावन्न हजार दोनशे अठ्ठयाणव फक्त) सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६-२२२०- माहिती व प्रसिद्धी, ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिद्धी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिद्धी मोहिम (योजनांतर्गत), २६ जाहिरात व प्रसिद्धी (संगणक सांकेतांक क्र. २२२०११७५) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

३. सदर खर्च करताना, शासकीय जाहिराती संदर्भात सर्वोच्च न्यायालयाने दिलेले निर्देश,शासनाचे निर्णय/परिपत्रक/ वित्तीय नियमावलीतील तरतूदी इ. चे पालन करावे तसेच शासनाने विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९२/१४४३, दिनांक २६/०९/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र ७५९/१५/व्यय ४, दिनांक २१/१०/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनेनिर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१०२६१६३०२२२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2015.10.26 16:36:52 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

२) महालेखापाल, (लेखापरीक्षण) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.

३) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, (१४४३), मंत्रालय, मुंबई.

७) कक्ष अधिकारी,वित्त विभाग,व्यय-४

८) निवड धारिका/ कार्यासन ३४